GR-2004072114301100-0300

चित्रपट तिकीटांची संगणकीकृत विक्री..
चित्रपट तिकीटांच्या मंजुरीबाबतच्या प्रशासकीय कार्यपध्दतीत सुधारणा करण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
महसूल व वन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : ईएनटी-१०९९/प्र.क्र.२१५/टी-१,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १ नोव्हेंबर, २००१.

वाचा :- शासन निर्णय, महसूल व वन विभाग
क्रमांक : ईएनटी-१०९९/प्र.क्र.२१५/टी-१, दिनांक : २१ सप्टेंबर २०००.

## शासन निर्णय

चित्रपटरसिकांना अधिकाधिक सुविधा पुरविण्याच्या दृष्टीकोनातून चित्रपट तिकीटांची संगणकीकृत विक्री करण्यास चित्रपटगृहमालकांना संदर्भाधीन शासन निर्णयान्वये परवानगी देण्यात आली आहे. तसेच संगणकीकृत तिकीटविक्रीच्या अनुषंगाने चित्रपट तिकीटांचे मुद्रण, तिकीटांना मंजुरी, विक्री झालेल्या तिकीटांच्या स्थळप्रतींचे नाशन यासंबंधी अंमलात आणावयाची नवीन प्रशासकीय कार्यपध्दतीही सदर शासन निर्णयान्वये विहित करण्यात आली आहे.

२. वरीलप्रमाणे संगणकीकृत विक्री करण्यास परवानगी देण्यासंबंधीच्या उक्त शासन निर्णयाच्या विवरणपत्र-१ मधील परिच्छेद ब (५) मध्ये अशी तरतूद करण्यात आली आहे की, प्रत्येक रोलमध्ये ५०० तिकीटे असावित. यापैकी पहिल्या व शेवटच्या तिकीटांच्या तिस-या भागाच्या पार्श्वभागावर गोल रबरी शिक्क्याने मुद्रांकन करण्यात यावे. तसेच, सदर तिकीटांच्या पार्श्वभागावर करमणूक शुल्क निरीक्षकाने स्वतःच्या पदनामाचा रबरी शिक्का उमटवून त्यावर दिनांकित स्वाक्षरी करावी. तथापि, शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, तिकीटे रोलमध्ये गुंडाळलेली असल्याने पहिल्या व शेवटच्या तिकीटावर मुद्रांकन करणे तांत्रिकदृष्टया शक्य नाही.

३. वरील अडचणींचा साकल्याने विचार केल्यानंतर शासन उक्त परिच्छेद ब (५) मधील आदेशात अंशतः दुरुस्ती करुन असे सुधारीत आदेश देत

आहे की, जर रोलच्या पहिल्या व शेवटच्या तिकीटाच्या पार्श्वभागावर रबरी गोल शिक्क्याने मुद्रांकन करणे शक्य नसल्यास, रोलच्या पहिल्या ३ तिकीटांच्या पार्श्वभागावर तसेच रोलच्या दोन्ही बाजूवर रबरी गोल शिक्क्याने मुद्रांकन करण्यात यावे. तदनंतर करमणूक शुल्क निरीक्षकाने स्वतःच्या पदनामाचा रबरी शिक्का सदर तिकीटांच्या पार्श्वभागावर उमटवून त्यावर दिनांकित स्वाक्षरी करावी.

४. संदर्भाधीन शासन निर्णयातील इतर आदेशात कोणतीही सुधारणा करण्यात आलेली नाही.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(माधव काळे)
कार्यासन अधिकारी,
महसूल व वन विभाग.

प्रति,

१. सर्व विभागीय आयुक्त.
२. सर्व जिल्हाधिकारी.
३. सर्व पोलीस आयुक्त.
४. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
५. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
६. गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७. सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. निवडनस्ती, टी-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.